**जातीचे प्रमाणपत्र व जात प्रमाणपत्र पडताळणी साठी कायम वास्तव्य वा सर्वसाधारण रहिवासाकरीता दिनांका बाबतचे स्पष्टीकरण**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीबीसी -२००९/प्र.क्र.७२७/मावक -५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ६ फेब्रुवारी , २०१०.**

वाचा :- १) शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक :- सीबीसी-१०९६/प्र.क्र.४८/मावक-५, दिनांक ३ जून, १९९६.
२) शासन निर्णय ,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग , क्रमांक :- सीबीसी-१२-२०००/२५२/प्र.क्र.१ / इमाव-५ , दिनांक २५ जानेवारी, २०००.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग ,क्रमांक :- सीबीसी-१०/२००१/प्र.क्र.१२०/मावक-५, दि. १ नोव्हेंबर, २००१

**प्रस्तावना** :- अनुसूचित जाती , विमुक्त जाती ,भटक्या जमाती ,इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग या प्रवर्गातील व्यक्तींना जातीचे प्रमाणपत्र देताना तसेच जाती प्रमाणपत्राची पडताळणी करताना त्याच्या महाराष्ट्रातील कायमच्या वा सर्वसाधारण रहिवासाबाबत शासन निर्णय दिनांक ३ जून,१९९६ व १ नोव्हेंबर, २००१ मधील परिशिष्ट अ च्या सुचना क्रमांक २३ (३) व २३ (४) मध्ये तरतूद करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित जातीच्या व्यक्तीस प्रमाणपत्र देताना दि. १०-०८-१९५० च्या सर्वसाधारण रहिवासाची अट केंद्र शासनाने घातलेली आहे. तसेच राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती , इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गातील व्यक्तींना अथवा त्याच्या कुटुंबियांना अनुक्रमे दि. २१ नोव्हेंबर, १९६१,दि. १३ ऑक्टोबर, १९६७, दि. १३ जून, १९९५ रोजी वा तत्पुर्वी त्यांचा राज्यातील सर्वसाधारण रहिवास असण्याची अट दिनांक ०१ नोव्हेंबर, २००१ च्या शासन निर्णयात विहित करण्यात आलेली आहे. मागासवर्गीयांच्या जातीच्या यादीमध्ये नव्याने काही जातींचा समावेश विहित कार्यपध्दती अंती केला जातो.नव्याने समाविष्ट झालेल्या जातीबाबत कायम वास्तव , सर्वसाधारण रहिवासाबाबत कोणता पुरावा धरण्यात यावा याबाबत क्षेत्रीय अधिका-यांमध्ये संभ्रम निर्माण झाल्याचे आढळून आले आहे. सबब संदर्भाधीन शासन निर्णयात कायम वास्तव्य वा सर्वसाधारण रहिवासाबाबत काहीही तरतूदी असल्यातरी कायम वास्तव्य वा सर्वसाधारण रहिवासाच्या दिनांकाबाबत सुसुत्रता असणे आवश्यक आहे यासाठी खालील प्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :- अनुसूचित जाती , विमुक्त जाती ,भटक्या जमाती ,इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग या प्रवर्गासाठी जात प्रमाणपत्र देण्याची वा जात प्रमाणपत्राची पडताळणी करण्याची कार्यवाही विहित करताना महाराष्ट्र राज्यातील **" कायम वास्तव्य " , " सर्वसाधारण रहिवास"** याबाबतचा शब्द

प्रयोग यापुर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / परिपत्रक वा आदेशात अथवा स्पष्टीकरण / खुलाश्यात ज्या ज्या ठिकाणी करण्यात आला असेल त्या शब्दप्रयोगाचा अर्थ खालील प्रमाणे राहील :-

**अ)** घटनादेश वा शासन निर्णयान्वये एखादया जातीचा नव्याने समावेश ज्या प्रवर्गात करण्यात आला **त्या जाती प्रवर्गास विहित केलेल्या दिनांकाला** त्या जातीची व्यक्ती महाराष्ट्रात ज्या ठिकाणी कायम राहत आहे तो रहिवास मागासवर्ग म्हणून दर्जा प्राप्त होण्यासाठी आवश्यक असतो. जी व्यक्ती घटना आदेशाच्या किंवा जाती प्रवर्गास विहित केलेल्या दिनांकास राज्यात ज्या ठिकाणी कायम राहत असतील त्या ठिकाणचे वास्तव्य त्या व्यक्तीला कायम वास्तव्याचे ठिकाण म्हणून प्राप्त होईल.

**ब)** महाराष्ट्र राज्याच्या मागासवर्गीय व्यक्तीचा/ त्याच्या कुटुंबाचा सर्वसाधारण रहिवासा करीता वास्तव्याचा किमान दिनांक (Cut of Date) खालील प्रमाणे राहील :-

| अ.क्र. | प्रवर्ग | वास्तव्याचा किमान दिनांक |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | १० ऑगस्ट, १९५० |
| २ | विमुक्त जाती ,भटक्या जमाती | २१ नोव्हेंबर, १९६१ |
| ३ | इतर मागासवर्ग | १३ ऑक्टोबर, १९६७ |

**क)** विशेष मागासप्रवर्गाची निर्मिती जरी दिनांक १३ जुन,१९९५ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली असली तरी सदर प्रवर्गातील काही जाती हया इतर मागासवर्गातून विशेष मागासप्रवर्गात समाविष्ट केल्या असल्याने तसेच काही जाती खुल्या प्रवर्गातून आल्याने सदर जातीच्या व्यक्तींना कायम वास्तव वा सर्वसाधारण रहिवासा बाबत इतर मागासवर्ग प्रवर्गासाठी विहित केलेल्या दिनांकाची अट लागू राहील.

**ड)** वर नमुद केलेल्या दिनांकाला अर्जदार महाराष्ट्र राज्याच्या सर्वसाधारण रहिवासी असेल तर संबंधित अर्जदाराचे किंवा अर्जदाराचा जन्म या तारखेनंतर झाला असल्यास त्याच्या वडिलांचे वा वडिलांच्या वडिलाचे कायम वास्तव्य ज्या ठिकाणी होते त्या क्षेत्राशी संबंधित असलेला सक्षम प्राधिकारी जातीचे प्रमाणपत्र देण्यास सक्षम आहे.तथापि राज्यातील सर्वसाधारण वास्तव्य असलेली मागासवर्गीय व्यक्ती एका जिल्हयातून दुस-या जिल्हयात शिक्षण वा नोकरी इ. करीता स्थलांतरीत झालेली असेल व त्या ठिकाणी स्थायिक झाली असेल अशा व्यक्तींना शासन परिपत्रक दिनांक १०/०३/२००५ व दिनांक १३/०९/२००५ मध्ये विहित केल्यानुसार ते स्थायिक असलेल्या क्षेत्रातील सक्षम प्राधिका-याकडून जातीचे प्रमाणपत्र काढण्याबाबत सुट देण्यात आली आहे. याचा लाभ बाहेरच्या राज्यातून महाराष्ट्र राज्यात स्थलांतरीत झालेल्या मागासवर्गीय घटकांना मिळणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक **२०१००२०६१२५५३७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सतीश गवई )

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,

मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेते, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक / प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी
सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी, सर्व विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या १ व २, विभागीय समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालय, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपुर, अमरावती, लातुर
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी /सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
आयुक्त, सर्व महानगर पालिका
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
सर्व कार्यासन, सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.* पत्राद्वारे.

यांना विनंती की, त्यांनी सदर परिपत्रकास व्यापक प्रसिध्दी द्यावी.

निवड नस्ती, का मावक-५